# Young & Restless

Netअक्षरी

ई-साहित्य प्रकाशन

वर्ष दुसरे, अंक-२
दिनांक ३ डिसेंबर २००९

**संपादक**

भारती सरमळकर (मुंबई)

**सह संपादक**

सोनाली घाटपांडे (पुणे)
स्वप्ना कोल्हे (नाशिक)
सचिन काकडे (मुंबई)

हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी.
netaksharee@gmail.com

...संपादकीय...

# Young & Restless

हो खरंय अगदी, ह्या अंकात मी अश्याच यंग आणि रेस्ट्लेस कवींच्या... नाही माझ्या मित्र मैत्रीणींच्या *rather* हल्लीच्या यंग *GenNext* च्या भाषेत बोलयचं झालं तर ***Buddies*** च्या एकाहुन एक अप्रतिम काव्य रचना आपल्यासमोर सादर करत आहे. मला अस वाटतं की आयुष्याच्या ह्याच टप्प्यावर आपण सगळ्यात जास्त कुणाच्या जवळ असतो तर ते आपल्या छंदांच्या...नवीन सुरुवात, नवे मनसुबे, नवीन मित्र यार हाच टप्पा आपल्या आयुष्याला एक नवीन वळण देत असतो, एक नवीन आनंद देत असतो एक नवीन समाधान देत असतो, मग कुणी चित्रकलेचे क्लास लावतं तर कुणी शास्त्रीय संगीताचे, कुणी नाणी जमा करु लागतं तर कुणी अडगळीत धुळ खात पडलेली तबला आणि बासुरी बाहेर काढतं तर कुणाला नातवंडांच्या खेळात रमायला आवडतं. हे वयचं अस असतं. पण माझे हे ***Buddies*** जरा हटके आहेत. हे कविता लिहितात... अहा नुस्त्या डायरीत नाहीत तर चक्क ऑनलाईन येऊन ऑर्कुटवर !!! आहेत ना माझे हे ***Buddies*** खास. त्याही पेक्षा ते आहेत प्रचंड उत्साही. अहो हा उत्साहच नाही का. मला सांगा एकतर संगणक हा एक स्वतंत्र अभ्यासाचा विषय त्यात हे माझे ***Buddies*** ऑनलाईन येतात, मराठी टायपिंगच सॉफ्ट्वेअर शिकतात, आपल्या कविता टाईप करुन पोस्ट करतात. वाह !!! मानलं तुम्हाला सग्ळ्यांना खरंच. त्यांच्या ह्या जबरदस्त उत्साही इच्छाशक्तीला दाद द्यावी तितकी कमीच. खरचं आमची *GenNext* जेव्हा त्यांच्या वयाची होईल तेव्हा आमच्यातही इतकीच इच्छाशक्ती असेल का? नवीन शिकण्याची अशी हौस असेल का? हम्म्म्म्म्म माहीत नाही खरचं माहीत नाही. म्हणूनच हा खास अंक मी माझ्या ह्या सर्व ***Young, Restless, Happy*** आणि ***Enthusiastic Buddies*** ना समर्पित करतेय.

*Hey Hats Off to you all "Young Hearts" out ther...*
*Keep writing and keep rocking !!!*

**भारती सरमळकर**

(मुंबई), संपादक



# श्रीमती मंगला म. आमडेकर,

मुंबई
वय – ७९ वर्षे
छंद – कविता, आध्यात्मिक वाचन, आध्यात्मिक चर्चा.

## ...मनपाखरु...

माहेराच्या माझ्या गावी, वाडा असे तो चौसपी
वाट नाही वळणाची, आहे अगदी ती सोपी

घर असे ते कौलारु, तेथ नांदे दिगंबरु
क्षणोक्षणी त्याला स्मरु, आणि अवघा पंथ धरु

प्रेमाचे असे भंडार, मायेची ती साठवण
घडोघडी येई मज, माहेरची आठवण

मागेपुढे ते अंगण, दारी सडा सारवण
झाडवेली डोलताती, फुलांची ती पखरण

परसात पारिजात, भासे मला माझा तात
वृंदावनात तुळस, वाटे मला माझी माय

जाईजुई ती शेवंती, माझ्या बहीणी असती
झेंडू आणि तो मोगरा, भाऊ माझा असे खरा

काऊचिऊ अंगणात, दाणे टिपती भराभरा
मोती रखवाला खरा, घालीतसे येरझारा

काळी कपिला ती गाय, गोठ्यामध्ये हंबरते
भुकेलेल्या पाडसाला, गोड दुध प्रेमे देते

माझ्या मनाचे पाखरु, माहेरास झेपावते
आणि अवघी भेट होते, मन माझे सुखावते

.....श्रीमती मंगला म. आमडेकर



## श्रीमती सई श्रीपाद लेले, ठाणे, वय – ७१ वर्षे

छंद – शब्दांवर मनापासून प्रेम करणे.शालेय जीवनापासून कविता लेखनाला सुरुवात, मनातल्या भावनांना तितकेच योग्य शब्द मिळेपर्यन्त वाट बघणे हा स्वभावाचा भाग. याखेरीज विवाह बिघडलेल्यांसाठी समुपदेशन.

# ...आणीबाणी...



थकविली गात्रे
शिणविली वाणी
तरी घोर आणीबाणी
संपेचिना

शब्दांनी मारीले
शब्दांनी पोळिले
शब्दांनी फेडीली
वस्त्रे सारी

हातामध्ये छडी
राज्य चाले त्याचे
मोलाच्या प्रश्नांचे
श्रम वाया

दर्शवली दिशा
तिथे वळे दृष्टी
श्रवणांना तुष्टी
सांगा ते ते

स्वतंत्र विचारा
गुंडाळ तू गाशा
आणि बडवी ताशा
पोपटपंचीचा

ह्यांच्यासाठी झटा
त्यांच्यासाठी हटा
तुम्ही फक्त फुटा
आंत आंत

किती ही खिन्नता
किती गुदमर
खुशी वरवर
दाखवावी कैशी

या हो या अंनता
या हो जगन्नाथा
शांतवा हा जीव तुम्ही
थोर त्राता

.....श्रीमती सई श्रीपाद लेले



## श्री. अरविंद चौधरी, जळगाव, वय – ६० वर्षे

व्यवसायाने एक अभियंता,कवयित्री बहिणाबाईंचे गाव जळगाव येथील रहिवाशी. जीवनात विज्ञानाचा, अभियांत्रिकीचा अभ्यास करीत करीत कवितांच्या प्रदेशात मुक्काम ठेवला आहे. आधी सुरुवात हिंदी कवितांपासून झाली, सर्वश्री सुमित्रनंद पंत जी, भगवतीशरण जी, महादेवी वर्मा तर मराठीतील बहुतेक नामवंत कविवर्यांच्या कवितांचा आस्वाद घेतला. अनंतकोटी ब्रह्माण्ड्नायक गोपाळकृष्णावर जीव जडला. भक्ति केली. परमात्मा सतस्वरुपी रामाचा 'राम राम' मंत्र जपला. अनंतकोटी ब्रह्माण्डनायक श्रीकृष्ण 'मायाधीश' आहे तर आपण सारे 'मायाधीन' आहोत. दाम माया का, तोड सका न कोय। मायेचं हे जाळ त्याच्याशिवाय कोणीच तोडू शकत नाही. मायाधीशाच ओतप्रोत अस्तित्व कुणीही नाकारु शकत नाही. अनंतकोटी ब्रह्माण्डनायक राधेकृष्णास त्रिवार वंदन. //ॐ नमो भगवते वासुदेवाय //

## ...आपले सांगाती...



विचार, वासना, विकार
सदैव आपले सांगाती
पंचतत्वात जातो देह,
मन मात्र कायम सोबती

दिली विधात्याने संधी,
समस्यातून शिकण्याची
संकटाना सामोरे जाऊन
हृदयाची भाषा जाणण्याची

दया, प्रेम आणि करुणा
हृदयात ओतप्रोत रहावी
साधना, सत्संग नि सेवा
सातत्याने करावी

इंद्रिये, मन नि बुद्धि
जीवनाची चाके खरी
साहस, समज नि विवेक
सदव ठेऊ या उरी

स्थूल शरीर गळता
सुक्ष्म शरीर उरते
सकारात्मक विचारधारा
मात्र आनंद देत राहते

**.....श्री. अरविंद चौधरी**



## श्री. मंगेश नारायण बिरारी, नाशिक, वय– ५९ वर्षे

बी.वाय.के. कॉलेज नाशिक येथून २००८ साली रजीस्ट्रार म्हणून सेवानिवृत्त, कवितेव्यतिरिक्त छंद - स्टॅंप्स, नाणी संग्रह, प्रसिद्ध लेखक प्रा. आनंद यादव व कवी योगेश्वर अभ्यंकर यांचे कवितेच्या बाबतीत विशेष मार्गदर्शन लाभले. वयाच्या विसाव्या वर्षी "स्मृति" नावाचा हस्तलिखित काव्य संग्रह प्रकाशित. त्यानंतर सात मित्रांनी मिळून "सप्तर्षी" आणि त्यानंतर "अशामंप्र वर्ग" हे दोन हस्तलिखित काव्यसंग्रह प्रकाशित केले होते. नाशिक मधल्या प्रातिनिधिक कवींचा "काफिला" नावाच्या काव्यसंग्रहात एक कविता प्रकाशित झाली होती. त्या संग्रहाच्या प्रस्तावनेत माझ्या कवितेचे कविवर्य कुसुमाग्रजांनी कौतुक केले होते.

## ...सुख...



*भरभरुन किती देतो तरीही नाही आटत कधी समुद्र*
*आकाशाच्या मनात खोट नाही, नाही कुठे एकही छिद्र*

*अविरत वाहतो वारा कधी नाही अडवत कुणाचेच श्वास*
*फुलते फुलवीते बहरुन येते आणि भरविते पृथ्वी घास*

*सूर्य ग्रह चांदण्या तारे सारे सदैव प्रकाश देतात*
*या सगळयांचे अंश म्हणून सारे सजीव जन्मास येतात*

*सृष्टीचे हे सारे नियम आचरणात कुठे आणतो मानव?*
*उपेक्षिता बद्दल दुःख नाही, शोषिता बद्दल नाही कणव*

*प्यायच पाणी माठात भरावं इतकच सुख भरुन घ्याव*
*ओसंडून जे वाहील त्याला अर्ध्य म्हणून वाटून द्याव.....!*

**....."स्वप्निल"**
**.....श्री. मंगेश नारायण बिरारी**




**श्रीमती रजनी अरणकल्ले**, पुणे, वय – ५४ वर्षे

छंद – कविता करणे, वाचन


## ...पुन्हा भेटलो आम्ही दोघी...

पुन्हा भेटलो आम्ही दोघी
नजरेनी बोलणे झाले
शब्दांची देवाण घेवाण झाली
मधल्या काळच्या गोष्टी झाल्या

निघताना तिने विचारले हळूच
काय काय मिळवलेस...
माणिक-मोती,सोने नाणे?
झाली का साकार सारी स्वप्ने?

मानाने हिशेब केला,
डोळ्याला डोळा भिडवला
शांतपणे मुठ उघडली
त्यातील सर्व स्वप्ने दाखवली

तिला दिसले, ती हसली
एकेक शिंपला उघडला
सर्व मोती गोळा केले
माझ्या हाती तिने दिले

पुन्हा भेटलो आम्ही दोघी,
स्वप्नरुपी मोती घेऊन
मी आरशासमोर,
ती आरश्याच्या आतून!!

... श्रीमती रजनी अरणकल्ले



# श्री. सुरेश शिरोडकर, मुंबई, वयः ४८ वर्षे

जन्मगाव : सावंतवाडी, सध्याचे वास्तव्य : बोरीवली, मुंबई
छंद : क्रिकेट, संगीत ऐकणे (भक्तिसंगीत, लोकसंगीत)
जे काही सुचते ते वेडे-वाकुडे लिहीतो पण अजून मी स्वतःला कवी मानत नाही. जुलै २००७ साली ऑरकुटवर आलो आणि " मराठी कविता" कम्युनिटिचा सभासद झालो. सनील पांगे आणि प्रभा प्रभुदेसाई यांच्या कडून प्रेरणा घेऊन वयाच्या ४९ व्या वर्षी मी माझी पहिली कविता लिहिली. कुसुमाग्रज, सुरेश भट, बोरकर हे आवडते कवी. अशा अनेक कविंच्या पडद्याआड गेलेल्या जुन्या कविता वाचकांसमोर याव्यात म्हणुन काव्यांजली आणि मराठी कविता या दोन्ही कम्युनिटीवर "बालभारती आठवणीतील कविता" हा धागा सुरु केला. गेल्या वर्षभरात या धाग्यावर बालभारती अभ्यासक्रमातील जवळ जवळ ३०० कवितांचा संग्रह झाला आहे.

## ...पडकं घर...



हृदयात चांदण्याचे
दवबिंदू साठलेले
नव्हते मूळीच तेव्हा
आभाळ फाटलेले

मनी साठवून आशा
जग हिंडण्यास गेलो
या सांजवेळी का मी
पडक्या घरात आलो

कमवून मोल होतो
गमवून फोल झालो
मी कालचा कुबेर
ओसाड गावी आलो

सय अंतरात होती
प्रित बंधनात होती
तट तोडूनिया सारे
ढळली कशी ही नाती?

छत अंबरी ऊडाले
डोहात हेलकावे
सांगा मुक्या मनाने
आता किती सहावे

भेगाळले भिताड
शेवाळले छताड
दुभंगल्या मनाचे
सांधु किती छेद

वाड्यास नाही वासे
वारुळ भग्न भासे
गांधील झोंबताना
घेवू कसे उसासे

ऊरी आर्त घाव आहे
कंठात कंप आहे
माझेच कर्मगीत
हा कोण गात आहे?

.....सुरेश शिरोडकर



## श्री उपेंद्र चिंचोरे, पुणे, वय – ५९ वर्षे

आजवर विविध विषयावर लेखन (गद्य तसेच पद्य) प्रसिद्ध झाले आहे. विविध वर्तमानपत्रे, मासिके, विशेषांक, गौरवग्रंथ ह्यामधुन लेखन. पुणे आकाशवाणी केंद्रावरुन कवितांचे अनेक कार्यक्रम प्रसारित झाले आहेत. भारतीय वायुसेनेचे "अमृत वर्षाचे गाणे" मी लिहिले आहे. माजी राष्ट्रपती डॉक्टर ए.पी.जे. कलाम सर ह्यांचे आवाहनाप्रमाणे "विज्ञानाचे गाणे" हे समूह गीत मी लिहिले. ज्याला मा. राष्ट्रपती डॉक्टर कलाम सर ह्यांचे वैयक्तिक सन्मान पत्र मला आले. साहित्य, संगीत, विज्ञान, कला अश्या क्षेत्रातल्या नामवंतांच्या गाठी भेटी.

# ...आणि पाऊस धरेस भिडला...

आणि पाऊस धरेस भिडला
आषाढ सरला, श्रावण आला,
सांग पावसा कुठेशी दडला?

तुला गौरविले जीवनदाता
स्वतःच ठरला खोटा आता
कां रे असा डोळा उघडला?
सांग पावसा कुठेशी दडला?

करीत होता मेघगर्जना
गडगडोनी भिववी जनांना
मुहूर्त टळला, तरीही अडला
सांग पावसा कुठेशी दडला?

धाडधाड तू कोसळणारा
छप्पर ढगांचे फाडणारा
मेघराजा तो इतिहास घडला
सांग पावसा कुठेशी दडला?

केली पेरणी, फळा न आली
उरली-सुरली आशा पळाली
बोल तुला रे कोणी कोंडला?
सांग पावसा कुठेशी दडला?

अवर्षणाची अवकाळी ऐरण
गाई-गुरांना नाही वैरण
भयभीत होऊनी, जीवच उडला
सांग पावसा कुठेशी दडला?



मेघा धरणे कुणी भरावी?
वरुणा, करुणा किती करावी?
भयसागरी या मानव बुडला
सांग पावसा कुठेशी दडला?

फसवे ढग हे अवती-भवती
हुलकाउनी तोंड फिरवती
पेच तुला कां, कसला पडला?
सांग पावसा कुठेशी दडला?

अवर्षणाने घडे उपोषण
उपोषणाने घडे कुपोषण
न जाणो दिस कसा पुढला?
सांग पावसा कुठेशी दडला?

जलातुनी रे जीव जन्मतो
जलाकरणे जीव पोसतो
हाय! जलाविण तो तडफडला
सांग पावसा कुठेशी दडला?

आमिष तुजला नसे धनाचे
वचन हवे कां संतुलनाचे
संकल्प आज मी झणी सोडला
आणि पाऊस धरेस भिडला...
आणि पाऊस धरेस भिडला

.....उपेंद्र चिंचोरे



## श्री. सुरेश गोपाळ पेठे, पुणे, वय – ६६ वर्षे

शिक्षण ११ वी एस.एस.सी नाशिकच्या पेठे विद्यालयातून. पुढे डिप्लोमा इन सिव्हिल इंजीनीयरींग पॉलिटेकनिक पुणे येथून. सध्या निवृत्त आहे. "कविता" ही गध्देपंचविशीतील, पण साधने अभावी ती दूर पळून गेली. आता लागलेली कवितेची लागण आणि ऑर्कुटची सवय ही अगदी अलीकडची म्हणजे अगदी सांगायचच झालं तर जुलै २००८. गेली सहा वर्षे चित्रकलेची साधना चालू आहे. सेवानिवृत्ती नंतर संस्कारभारती ह्या संस्थेशी संबंध आला आणि माझे आयुष्यच आमूलाग्र बदलून गेले.

# ...किती पाहू वाट?



युगायुगांची तुझी प्रतिक्षा
ठरलेली रे माझी कक्षा
मजला नुमजे वाट
किती पाहू रे तुझी वाट?

भव्य दिव्य तुझी ती किर्ती
मला वाटते रे भीती
पाहीला तुझा तो थाट
किती पाहू रे तुझी वाट?

साथ तुझी जन्मांतरीची
ताटकळण्याची शिक्षा कसची?
कशी थोपवू उर्मीची लाट
किती पाहू रे तुझी वाट?

जन्मभरीच्या श्वासांतूनही
कधी न चिंतिले तुजवाचोनि
सांग कधी येईल पहाट
किती पाहू रे तुझी वाट?

.....श्री. सुरेश गोपाळ पेठे

काव्यांजली आणि मराठी कविता तुमच्यासाठी घेऊन येत आहेत

# नवरस काव्यस्पर्धा मालिका

यात आहेत साहित्यातील नऊ रस
प्रत्येक स्पर्धा एका रसावरील कवितांची
नऊ रस नऊ स्पर्धा.. एक महामालिकाच म्हणाना!!!

दर महिन्याला एक रस – तब्बल नऊ महिने चालणारे ही धम्माल !!!

काव्यस्पर्धेचा उद्देश 'चढाओढ' हा नाही,
कोणी छोटं - मोठं, कविता चांगली वाईट सिद्ध करणं हा ही नाही.
ही स्पर्धा आपल्या प्रतिभेला आव्हान आहे, सृजनशक्तीला आवाहन आहे.
निवडक कविता नेटाक्षरीमध्ये प्रसिद्ध होतील, हजारोंपर्यंत जातील, बक्षीसेही असतीलच

लिहा मंडळी ! बघुया महाराष्ट्राच्या उद्याच्या 'लेखण्या' काय आहेत ते!

## या महिन्याचा 'रस' विषय 'शांतरस'

तुमच्या 'शांतरस' पूर्ण कविता आम्हाला १५ डिसेंबर, २००९ पर्यंत

**marathikavitamarathispardha@gmail.com**

वर पाठवा. सोबत आपल्या ऑरकुट प्रोफाईलची व ब्लॉगची लिंक नक्की पाठवा
अधिक माहिती कम्युनिटीवर मिळेल.

---

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास नेटाक्षरी जोमाने पार पाडीत आहे.दर आठवड्यात मिळणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणित होतो आहे. नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ४०००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. ह्याव्यतिरिक्त वेबसाईटवर व्हिजीट करुन वाचणाऱ्यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या मित्रपरिवारास फॉरवर्ड करण्यास आमची काहीही हरकत नाही. सोबतच,असे करतांना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आपले अत्यंत आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा.
आपल्यासारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक एक लक्ष वाचकांपर्यंत पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.
हा अंक विनामुल्य मिळवण्यासाठी, तसेच सूचना-अभिप्राय व प्रतिक्रियांसाठी

**netaksharee@gmail.com**



**लवकरच येत आहे.............**

**"ई-वर्ले अक्षर"**

**"वर्धापन सोहळा विशेषांक"**